# नारद भक्ति सूत्र

## मूळ संस्कृत संहिता, मराठी अनुवादासहित


संपादक व अनुवादक

डॉ .नीलेश जोशी

**M.A. Sanskrit, NET, SET, Ph.D. व्याकरणशास्त्री**






**eBook Publication Pvt. Ltd.**

प्रथमावृत्ती २०१८

# नारद भक्ति सूत्र

## मूळ संस्कृत संहिता, मराठी अनुवादासहित


संपादक व अनुवादक

डॉ .नीलेश जोशी

**M.A. Sanskrit, NET, SET, Ph.D.** व्याकरणशास्त्री






**eBook Publication Pvt. Ltd.**

प्रथमावृत्ती २०१८

**नारद भक्ति-सूत्र**

**मूळ संस्कृत संहिता, मराठी अनुवादासहित**

---

**संपादक व अनुवादक : डॉ. नीलेश जोशी,**

**वरिष्ठ भाषाशास्त्रज्ञ, IIT मुंबई,**

**पवई, महाराष्ट्र ४०००७६**

**प्रथमावृत्ती: २ सप्टेंबर २०१८**

**प्रकाशक:**

**eBook Publication Pvt. Ltd.**

**पितृछाया, सखाराम कीर मार्ग,**

**दादर (प.) मुंबई, महाराष्ट्र ४०००१६**

**भ्रमणध्वनी: (+९१) ७०३८१६४०२२**

# eBook Terms & Conditions

## 1. This eBook* may be

a. Distributed without modification or sale.

b. Copied for personal and educational use.

c. Printed for personal and educational use.

## 2. This eBook* may NOT be

a. Sold individually or as part of package.

b. Modified in any way.

c. Reversed-engineered.



***eBook refers to this PDF and any of its content including pages and images in either electronic or printed form.**

# अनुक्रमणिका

## प्रस्तावना

नारद भक्ति सूत्र देवर्षि नारदानी रचली आहेत. देवर्षि नारद भक्तिमार्गातील सर्वोत्कृष्ट आचार्य मानले जातात.

देवर्षि नारद  रचित 'नारद भक्ति सूत्र' च्या ८४ सूत्रांमध्ये भक्ति विषयक विचार मांडले आहेत. ते पुढीलप्रमाणे -

भक्तीची व्याख्या, महत्ता, लक्षण, साधन, भगवंताचे स्वरूप, भक्तीचे नियम, फळ इत्यादी विषयी विस्तारपूर्वक चर्चा केली आहे.

भक्ति ही भगवंता प्रति परम प्रेमरूपा, अमृत स्वरूपा आहे. अन्याश्रयाचा त्याग करणे, भगवंताला आपली सर्व कर्मे अर्पण करणे, सर्वकामनांचा त्याग करणे, ही भक्तीची लक्षणे आहेत. ज्ञानयुक्त भक्ति सर्वोत्तम आहे. भगवंताच्या विरहाने व्याकुळ होणे हे भक्तीचे चिह्न आहे. आदर्श भक्तीचा दाखला म्हणून  ब्रजवासी गोपिकांचा  उल्लेख केला आहे.

थोडक्यात, प्रेमरूपा भक्ती ही सर्वश्रेष्ठ आहे. अन्य कोणत्याही मार्गापेक्षा हा भक्तिमार्ग सहज, सुकर आहे. हे सिद्ध होते.

या ग्रंथाचे बहुत करून सर्व भारतीय भाषामध्ये भाषांतर झाले आहे. मराठीत सुद्धा यापूर्वी विवेचनासह भाषांतर ल. रा. पांगारकर यांनी केले आहे. ते नक्कीच अभ्यासकांसाठी उपयुक्त आहे.  येथे केवळ सूत्रांचे मराठी भाषांतर उपलब्ध व्हावे या विचाराने हे कार्य हाती घेऊन पूर्ण केले आहे.

नक्कीच कोणत्याही पूर्वग्रहा विना सूत्रांचा अभ्यास करणाऱ्या वाचक, अभ्यासकांना हे छोटेखानी पुस्तक आवडेल आणि उपयोगी ठरेल अशी आशा बाळगतो. श्रीरामार्पणमस्तु |

**डॉ. नीलेश जोशी,**

**गणेश चतुर्थी, २ सप्टेंबर, २०१८**

# नारद भक्ति सूत्र

## प्रथमोऽध्यायः

## परभक्तिस्वरूपम्

-----------------------------------------------

**१. अथातो भक्तिं व्याख्यास्यामः । १ - १.०१**

आता आम्ही भक्तीची व्याख्या करणार आहोत.

**२. सा त्वस्मिन् परप्रेमरूपा । २ - १.०२**

ती (भक्ती) परमेश्वराच्या ठिकाणी परम प्रेमस्वरूप (आहे.)

**३. अमृतस्वरूपा च । ३ - १.०३**

आणि अमृतस्वरूप देखील (आहे.)

**४. यल्लब्ध्वा पुमान् सिद्धो भवति अमृतो भवति तृप्तो भवति । ४ - १.०४**

जी (भक्ती) मिळवून मनुष्य सिद्ध होतो, अमर होतो, (आणि) तृप्त होतो.

**५. यत्प्राप्य न किञ्चिद् वाञ्छति न शोचति न द्वेष्टि न रमते नोत्साही भवति । १.०५**

जी प्राप्त झाल्यामुळे मनुष्य कशाची इच्छा करत नाही, शोक करत नाही, द्वेष करत नाही, कशात आसक्त होत नाही आणि (काही भोग, विलास मिळवण्यासाठी) उत्साही होत नाही.

**६. यज्ज्ञात्वा मत्तो भवति स्तब्धो भवति आत्मारामो भवति । १.०६**

जिला (भक्तीला) जाणून (मनुष्य) उन्मत्त होतो, स्वब्ध (शांत) होतो (आणि) आत्माराम होतो.

**७. सा न कामयमाना निरोधरूपत्वात् । १.०७**

ती (प्रेमस्वरूपा भक्ती) निरोधस्वरूप असल्यामुळे कामनायुक्त नाही.

**८. निरोधस्तु लोकवेदव्यापारन्यासः । १.०८**

लौकिक आणि वैदिक (अशा सर्व) कर्मांचा त्याग म्हणजे निरोध होय.

**९. तस्मिन्ननन्यता तद्विरोधिषूदासीनता च । १.०९**

त्या परमेश्वराच्या ठिकाणी अनन्यभाव आणि त्या व्यतिरिक्त विषयांच्या बाबत उदासीनता म्हणजेही (निरोध होय.)

**१०. अन्याश्रयाणां त्यागोनन्यता । १.१०**

(परमेश्वराच्या शिवाय) अन्य कोणत्याही आश्रयाचा त्याग म्हणजे अनन्यता होय.

**११. लोकवेदेषु तदनुकूलाचरणं तद्विरोधिषूदासीनता । १.११**

परमेश्वराला अनुकूल लौकिक आणि वैदिक कर्मे करणे हेच तद्व्यतिरिक्त विषयांच्या बाबतीत उदासीनता होय.

**१२. भवतु निश्चयदार्ढ्यादूर्ध्वं शास्त्ररक्षणम् । १.१२**

(परमेश्वर प्राप्ती हेच ध्येय असा) दृढनिश्चय करून त्यानुसार शास्त्र रक्षण करावे.

**१३. अन्यथा पातित्यशङ्कया । १.१३**

अन्यथा पतित होण्याची संभावना आहे.

**१४. लोकोऽपि तावदेव भोजनादिव्यापारस्त्वाशरीरधारणावधि । १.१४**

लौकिक कर्मांच्या बाबत असेच, पण भोजन इत्यादी कर्मे शरीर आहे त्यापर्यंत चालतील.

**१५. तल्लक्षणानि वाच्यन्ते नानामतभेदात् । १.१५**

विविध मताप्रमाणे भक्तीची लक्षणे सांगू.

**१६. पूजादिष्वनुराग इति पाराशर्यः । १.१६**

व्यास (पाराशर्य) मते (भगवंताच्या) पूजा इत्यादीच्या ठिकाणी प्रेम म्हणजे भक्ती होय.

**१७. कथादिष्विति गर्गः । १.१७**

गर्गाचार्यांच्या मते, (भगवंताच्या) कथा इत्यादीच्या ठिकाणी प्रेम म्हणजे भक्ती होय.

**१८. आत्मरत्यविरोधेनेति शाण्डिल्यः । १.१८**

शांडिल्य मते, आत्मरतीच्या अविरोधी विषयी प्रेम म्हणजे भक्ती होय.

**१९. नारदस्तु तदर्पिताखिलाचारता तद्विस्मरणे परमव्याकुलतेति । १.१९**

पण नारदमुनीच्या मते, सर्व कर्मांना परमेश्वराला अर्पण करणे आणि त्याचे विस्मरण झाले तर परम व्याकुळता होणे भक्ती होय.

**२०. अस्त्येवमेवम् । १.२०**

हे असेच आहे.

**२१. यथा व्रजगोपिकानाम् । १.२१**

जशी व्रज गोपिकांची (भक्ती)

**२२. तत्रापि न माहात्म्यज्ञानविस्मृत्यपवादः । १.२२**

तेथेही (गोपिकांच्या ठिकाणी) माहात्म्यज्ञानाची (=श्रीकृष्ण परमात्मा आहे याची) विस्मृती अपवादानेही आढळत नाही.

**२३. तद्विहीनं जाराणामिव । १.२३**

त्याविना (=परमेश्वराचे खरे स्वरूप न जाणल्याविना) (असलेले प्रेम) जारप्रेमासमान (असते).

**२४. नास्त्येव तस्मिन् तत्सुखसुखित्वम् । १.२४**

कारण त्यामध्ये (जाराप्रेमामध्ये) प्रियकराच्या सुख वाटणे ही निरपेक्षता नसते.

========================================

## द्वितीयोऽध्यायः

## परभक्तिमहत्त्वम्

----------------------------------------

२५. **सा तु कर्मज्ञानयोगेभ्योऽप्यधिकतरा ।** २.०१

ती (प्रेमरूपा भक्ती) कर्म, ज्ञान आणि योगाहूनही श्रेष्ठ आहे.

२६. **फलरूपत्त्वात् ।** २.०२

कारण ( ती भक्ती) फलरूपा आहे.

२७. **ईश्वरस्याप्यभिमानद्वेषित्वात् दैन्यप्रियत्वात् च ।** २.०३

ईश्वरालाही अभिमानाचा द्वेष आणि दैन्य प्रिय आहे.

२८. **तस्याः ज्ञानमेव साधनमित्येके ।** २.०४

तिचे (भक्तीचे) साधन ज्ञानच आहे, असे काहींचे मत आहे.

२९. **अन्योन्याश्रयत्वमित्यन्ये ।** २.०५

(ज्ञान व भक्ती) एकमेकांवर आश्रित आहेत, असे काहींचे मत आहे.

३०. **स्वयं फलरूपतेति ब्रह्मकुमारः ।** २.०६

ब्रह्मकुमाराच्या मते, (भक्ती) स्वतः फलरूप आहे.

३१. **राजगृहभोजनादिषु तथैव दृष्टत्वात् ।** २.०७

राजवाडा व भोजन इत्यादी ठिकाणी असेच दिसते.

**३२. न तेन राजा परितोषः क्षुच्छान्तिर्वा । २.०८**

त्याने (=म्हणजे केवळ राजवाडा व भोजनाच्या कल्पनेने) राजा आनंदित होत नाही किंवा भूक शांत होत नाही.

**३३. तस्मात् सैव ग्राह्या मुमुक्षुभिः । २.०९**

म्हणून मोक्ष मिळवू इच्छिणाऱ्यासाठी भक्ती ग्रहण करण्यास योग्य आहे.

====================================

## तृतीयोऽध्यायः

## भक्तिसाधनानि

---------------------------------------

३४. **तस्याः साधनानि गायन्त्याचार्याः । ३.०१**

आचार्य तिची (भक्तीची) साधने सांगतात.

३५. **तत्तु विषयत्यागात् सङ्गत्यागात् च । ३.०२**

ती (भक्तीची साधने) विषयत्याग आणि संगत्याग

३६. **अव्यावृत्तभजनात् । ३.०३**

अखंडनामस्मरण भजन

३७. **लोकेऽपि भगवद्गुणश्रवणकीर्तनात् । ३.०४**

लौकिक जीवनातसुद्धा भगवद्गुण श्रवण व कीर्तन (भक्तीची साधने आहेत.)

३८. **मुख्यतस्तु महत्कृपयैव भगवत्कृपालेशाद् वा । ३.०५**

परंतु मुख्यतः महापुरुषांच्या कृपेने अथवा भगवत्कृपा मात्रानेच (भक्तीची प्राप्ती होते).

३९. **महत्सङ्गस्तु दुर्लभोऽगम्योऽमोघश्च । ३.०६**

परंतु महापुरुषांचा संग दुर्लभ, अगम्य आणि अमोघ (आहे.)

४०. **लभ्यतेऽपि तत्कृपयैव । ३.०७**

त्याच्या (भगवंताच्या) कृपेनेच (महापुरुषांचा) संग प्राप्त होतो.

४१. **तस्मिंस्तज्जने भेदाभावात् । ३.०८**

(कारण) तो (भगवंत) आणि त्याचे भक्त (संत, महापुरुष) यांच्यात अभेद आहे.

**४२. तदेव साध्यतां तदेव साध्यताम् । ३.०९**

म्हणून तीच (भगवत्कृपा) मिळवावी.

**४३. दुस्सङ्गः सर्वथैव त्याज्यः । ३.१०**

दुष्ट संगतीचा सर्वथा त्याग करावा.

**४४. कामक्रोधमोहस्मृतिभ्रंशबुद्धिनाशसर्वनाशकारणत्वात् । ३.११**

(दुष्ट संगती) काम, क्रोध, मोह, स्मृतिभ्रंश, बुद्धिनाश, सर्वस्व नाशास कारणीभूत आहे.

**४५. तरङ्गायिता अपीमे सङ्गात् समुद्रायन्ते । ३.१२**

हे (काम, क्रोध इत्यादी) लाटांप्रमाणे येऊन दुष्ट संगतीमुळे समुद्रासमान (रौद्ररूपी) होतात.

**४६. कस्तरति कस्तरति मायाम् यः सङ्गं त्यजति यो महानुभावं सेवते निर्ममो भवति । ३.१३**

कोण तरुन जातो, कोण ही माया तरून जातो? जो संगत्याग करतो, जो संतसज्जनांची सेवा करतो आणि जो ममतारहित होतो.

**४७. यो विविक्तस्थानं सेवते यो लोकबन्धमुन्मूलयति निस्त्रैगुण्यो भवति योगक्षेमं त्यजति । ३.१४**

जो निर्जन स्थानी राहतो, जो लौकिक बंधनांना तोडतो, त्रिगुणातीत होतो, योगक्षेमाचा त्याग करतो.

**४८. यः कर्मफलं त्यजति कर्माणि संन्यस्स्यति ततो निर्द्वन्द्वो भवति । ३.१५**

जो कर्मफळाचा त्याग करतो,  कर्मांचाही संन्यास घेतो तेव्हा द्वंद्व रहित होतो.

**४९.  यो वेदानपि संन्यस्यति केवलमविच्छिन्नानुरागं लभते । ३.१६**

जो वेदांचा संन्यास घेतो तोच केवळ अखंड भगवत्प्रेम प्राप्त करतो.

**५०.  स तरति स तरति स लोकांस्तारयति । ३.१७**

तोच (ही माया) तरतो आणि लोकांनाही तारतो.

========================================

## चतुर्थोऽध्यायः

## प्रेमनिर्वचनम्

--------------------------------------

**५१. अनिर्वचनीयं प्रेमस्वरूपम् । ४.०१**

प्रेमाचे स्वरूप अनिर्वचनीय (बोलून दाखवणे कठीण) आहे.

**५२. मूकास्वादनवत् । ४.०२**

हे मुक्याने गोड पदार्थाचा आस्वादासारखे आहे.

**५३. प्रकाशते क्वापि पात्रे । ४.०३**

पण एखाद्या पात्र व्यक्तीच्या ठिकाणी (प्रेमरूपा भक्ती) प्रकाशित होते.

**५४. गुणरहितं कामनारहितं प्रतिक्षणवर्धमानं अविच्छिन्नं सूक्ष्मतरं अनुभवरूपम् । ४.०४**

हे प्रेम गुणरहित, कामनारहित, प्रत्येक क्षणी वाढत जाणारे, अखंड, अत्यंत सूक्ष्म, अनुभवरूप असते.

**५५. तत्प्राप्य तदेवावलोकति तदेव शृणोति तदेव भाषयति तदेव चिन्तयति । ४.०५**

ते (प्रेम) मिळताच (प्रेमी भक्त) त्यालाच (प्रेमालाच) पाहत राहतो, त्यालाच ऐकतो, त्याचेच वर्णन करतो, त्याचेच चिंतन करतो.

**५६. गौणी त्रिधा गुणभेदाद् आर्तादिभेदाद् वा । ४.०६**

गौणी (भक्ती) गुणभेदाने अथवा आर्त[1] इत्यादी भेदाने तीन प्रकारची असते.

---

[1] आर्त, जिज्ञासू, अर्थार्थी, ज्ञानी हे आर्तादि-भेद होय. *Cf.* चतुर्विधा भजन्ते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन । आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥भ.गी. ७-१६॥

**५७. उत्तरस्मादुत्तरस्मात् पूर्व पूर्वा श्रेयाय भवति । ४.०७**

उत्तर-उत्तर (पुढे-पुढे वर्णन केलेल्या भक्ती)पेक्षा पूर्व-पूर्वीची भक्ती कल्याणकारी आहे.

**५८. अन्यस्मात् सौलभं भक्तौ । ४.०८**

अन्य कशाहीपेक्षा भक्ती सुलभ आहे.

**५९. प्रमाणान्तरस्यानपेक्षत्वात् स्वयं प्रमाणत्वात् । ४.०९**

भक्ती स्वतःच प्रमाणस्वरूप आहे, तिला अन्य प्रमाणाची आवश्यकता नाही.

**६०. शान्तिरूपात् परमानन्दरूपाच्च । ४.१०**

(भक्ती) शांतिरूप आणि परमानंदरूप आहे.

**६१. लोकहानौ चिन्ता न कार्या निवेदितात्मलोकवेदत्वात् । ४.११**

लौकिक कर्माबाबत चिंता करू नये; कारण (त्याची) लौकिक व वैदिक सर्वच कर्मे भगवंताला अर्पण केलेली असतात.

**६२. न तत्सिद्धौ लोकव्यवहारो हेयः किन्तु फलत्यागः तत्साधनं च । ४.१२**

जोपर्यंत (भक्ती) सिद्ध होत नाही, तोपर्यंत लोकव्यवहाराचा त्याग करू नये; पण (निष्कामभावनेने) फलत्याग करून (भक्तीची) साधना चालू ठेवावी.

**६३. स्त्रीधननास्तिकचरित्रं[2] न श्रवणीयम् । ४.१३**

स्त्री, पैसा आणि नास्तिक कथा याविषयी ऐकू नये.

---

[2] पाठभेद-स्त्रीधननास्तिकवैरिचरित्रं....गीताप्रेस,ना.भ.सू.६३, पृ.१३

**६४.    अभिमानदम्भादिकं त्याज्यम् । ४.१४**

अभिमान, दंभ, इत्यादींचा त्याग करावा.

**६५.    तदर्पिताखिलाचारः सन् कामक्रोधाभिमानादिकं तस्मिन्नेव करणीयम् । ४.१५**

सर्व कर्मे भगवंताला अर्पण करून ( यदा कदाचित) काम, क्रोध, अभिमान, इत्यादी (उत्पन्न झालेच तर) सुद्धा (भगवंताच्या) त्याच्याच ठिकाणी करावेत.

**६६.    त्रिरूपभङ्गपूर्वकम् नित्यदास्यनित्यकान्ताभजनात्मकं प्रेम कार्यं प्रेमैव कार्यम् । ४.१६**

तीन (स्वामी, सेवक, सेवा)[3] रूपांचा भंग करून नित्य दासभक्तीने[4] अथवा कांताभक्तीने प्रेमच करावे, प्रेमच करावे.

=====================================

[3] याशिवाय भज्य अर्थात देव, भक्त आणि भक्ती या तीन रूपांचा त्याग अर्थात त्रिपुटीचा भंग करावा.

[4] दासभक्ती श्रीरामभक्त हनुमानासमान, आणि कांताभक्ती श्रीलक्ष्मी वा गोपिकांसारखी.

## पञ्चमोऽध्यायः

## मुख्यभक्तिमहिमा

-------------------------------------

**६७. भक्ता एकान्तिनो मुख्याः । ५.०१**

एकनिष्ठ (भक्तच) मुख्य भक्त आहेत.

**६८. कण्ठावरोधरोमञ्चाश्रुभिः परस्परं लपमानाः पावयन्ति कुलानि पृथिवीं च । ५.०२**

कंठ दाटून आलेले, अंगावर रोमांच असलेले, एकामेकांशी संभाषण करणारे, असे भक्त स्वतःच्या कुळाबरोबर या पृथ्वीलाही पावन करतात.

**६९. तीर्थीकुर्वन्ति तीर्थानि सुकर्मीकुर्वन्ति कर्माणि सच्छास्त्रीकुर्वन्ति शास्त्राणि । ५.०३**

असे भक्त तीर्थक्षेत्रांना सुतीर्थ, कर्मांना सुकर्म आणि शास्त्रांना सत्-शास्त्र करतात.

**७०. तन्मयाः । ५.०४**

(कारण) ते तन्मय असतात.

**७१. मोदन्ते पितरो नृत्यन्ति देवताः सनाथा चेयं भूर्भवति । ५.०५**

(त्यांचे) पितरगण आनंदित होतात, देवता नाचू लागतात आणि ही पृथ्वी सनाथ होते.

**७२. नास्ति तेषु जातिविद्यारूपकुलधनक्रियादिभेदः । ५.०६**

त्यांच्यामध्ये जाती, विद्या, रूप, कुळ, पैसा आणि क्रिया इत्यादी भेद नसतात.

**७३. यतस्तदीयाः । ५.०७**

कारण ते (भक्तगण) त्याचे (भगवंताचे) झालेले असतात.

**७४. वादो नावलम्ब्यः । ५.०८**

(भक्तांनी) वाद-विवाद करू नये.

**७५. बाहुल्यावकाशत्वाद् अनियतत्त्वाच्च । ५.०९**

(कारण वाद-विवादात) पुष्कळ गोष्टीना (शब्द-अपशब्द, मारामारी इ..) जागा असते आणि त्यात (कोणतेही) नियम राहत नाहीत.

**७६. भक्तिशास्त्राणि मननीयानि तदुद्बोधकर्माणि करणीयानि । ५.१९**

(प्रेमस्वरूप भक्तीच्या प्राप्तीसाठी) भक्तिशास्त्राचे मनन केले पाहिजे, भक्तीचीच वृद्धी होईल अशी कर्मे केली पाहिजेत.

**७७. सुखदुःखेच्छालाभादित्यक्ते काले प्रतीक्ष्यमाणे क्षणार्धमपि व्यर्थं न नेयम् । ५.११**

सुख, दुःख, इच्छा, लाभ इत्यादींचा (पूर्ण) त्याग होईल अशा काळाची वाट पाहत एक क्षणही व्यर्थ घालवू नये.

**७८. अहिंसासत्यशौचदयास्तिक्यादिचरित्राणि परिपालनीयानि । ५.१२**

अहिंसा, सत्य, शौच, दया, आस्तिकता इत्यादी सदाचारांचे पालन केले पाहिजे.

**७९. सर्वदा सर्वभावेन निश्चिन्तैर्भगवानेव भजनीयः । ५.१३**

सर्वदा सर्वभावाने निश्चिंत होऊन केवळ भगवंताचेच भजन केले पाहिजे.

**८०. सङ्कीर्त्यमानः[5] शीघ्रमेवाविर्भवत्यनुभावयति भक्तान् । ५.१४**

सतत संकीर्तन केल्यावर भगवंत शीघ्रतेने प्रकट होतात आणि भक्तांना आपला अनुभव देतात.

**८१. त्रिसत्यस्य[6] भक्तिरेव गरीयसी भक्तिरेव गरीयसी । ५.१५**

तिन्ही सत्यांमध्ये भक्तीच श्रेष्ठ आहे, भक्तीच श्रेष्ठ आहे.

**८२. गुणमाहात्म्यासक्ति-रूपासक्ति-पूजासक्ति-स्मरणासक्ति-दास्यासक्ति-सख्यासक्ति-वात्सल्यसक्ति-कान्तासक्ति-आत्मनिवेदनासक्ति-तन्मयतासक्ति-परमविरहासक्ति-रूपा एकधा अपि एकादशधा भवति । ५.१६**

(ही प्रेमरूपा भक्ती) १. गुणमाहात्म्यासक्ति २. रूपासक्ति ३. पूजासक्ति ४. स्मरणासक्ति ५. दास्यासक्ति ६. सख्यासक्ति ७. वात्सल्यसक्ति ८. कान्तासक्ति ९. आत्मनिवेदनासक्ति १०. तन्मयतासक्ति ११. परमविरहासक्ति रूप ११ प्रकारची आहे.

**८३. इत्येवं वदन्ति जनजल्पनिर्भयाः एकमताः कुमार-व्यास-शुक-शाण्डिल्य-गर्ग-विष्णु-कौण्डिण्य-शेषोद्धवारुणि-बलि-हनुमद्-विभीषणादयो भक्त्याचार्याः । ५.१७**

असे कुमार (सनत्कुमार), वेदव्यास, शुकदेव, शांडिल्य, गर्ग, विष्णू, कौण्डिण्य, शेष, उद्धव, आरुणी, बली, हनुमान, विभीषण इत्यादी भक्तिमार्गाचे आचार्यगण लोक निंदा वा स्तुतीचे भय न बाळगता एकमताने सांगतात.

[5] पाठभेद- स कीर्त्यमानः ...गीताप्रेस,ना.भ.सू.८०, पृ.क्र.१६

[6] कायिक, वाचिक, मानसिक हे तीन प्रकार. अथवा वर्तमान, भूत, भविष्य या त्रिकालाबाधित सत्य

**८४. य इदं नारदप्रोक्तं शिवानुशासनं[7] विश्वसिति श्रद्धते स भक्तिमान्भवति सः प्रेष्टं लभते सः प्रेष्टं लभते । ५.१८**

हे नारदमुनीने सांगितलेल्या शिवानुशासनावर विश्वास ठेवतात, श्रद्धा ठेवतात, त्यांनाच वांछित मिळते नि कृतार्थ होतात.

अशा प्रकारे नारद भक्ती सूत्र पूर्ण झाली.

|| शुभं भवतु ||

==================================================

[7] शिवानुशासन म्हणजे शिव=कल्याण; कल्याणाचा उपदेश, किंवा शिव म्हणजे शंकर अर्थात आद्यशंकराचार्य त्यांचा हा उपदेश होय. कारण ते आद्य भक्त, आद्य वैष्णव आणि म्हणूनच आद्य गुरुही.

# परिशिष्ट

## 1. सूत्रसूची

| सूत्रसूची | | | |
|---|---|---|---|
| सूत्र | सूत्र क्र. | अध्याय-सू.क्र. | पृ.क्र. |
| अथातो भक्तिं व्याख्यास्यामः । | १ | १.०१ | १ |
| अनिर्वचनीयं प्रेमस्वरूपम् । | ५१ | ४.०१ | १० |
| अन्य मात् सौलभं भक्तौ । | ५८ | ४.०८ | ११ |
| अन्यथा पातित्यशङ्कया । | १३ | १.१३ | २ |
| अन्याश्रयाणां त्यागोनन्यता । | १० | १.१० | २ |
| अन्योन्याश्रयत्वमित्यन्ये । | २९ | २.०५ | ५ |
| अभिमानदम्भादिकं त्याज्यम् । | ६४ | ४.१४ | १२ |
| अमृतस्वरूपा च । | ३ | १.०३ | १ |
| अव्यावृत्तभजनात् । | ३६ | ३.०३ | ७ |
| अस्त्येवमेवम् । | २० | १.२० | ३ |
| अहिंसासत्यशौचदयास्तिक्यादिचरित्राणि परिपालनीयानि । | ७८ | ५.१२ | १४ |
| आत्मरत्यविरोधेनेति शाण्डिल्यः । | १८ | १.१८ | ३ |
| इत्येवं वदन्ति जनजल्पनिर्भयाः एकमताः कुमार-व्यास-शुक-शाण्डिल्य-गर्ग-विष्णु-कौण्डिण्य-शेषोद्धवारुणि-बलि-हनुमद्-विभीषणादयो भक्त्याचार्याः । | ८३ | ५.१७ | १५ |
| ईश्वरस्याप्यभिमानद्वेषित्वात् दैन्यप्रियत्वात् च । | २७ | २.०३ | ५ |
| उत्तरस्मादुत्तरस्मात् पूर्व पूर्वा श्रेयाय भवति । | ५७ | ४.०७ | ११ |
| कण्ठावरोधरोमञ्चाश्रुभिः परस्परं लपमानाः पावयन्ति कुलानि पृथिवीं च । | ६८ | ५.०२ | १३ |
| कथादिष्विति गर्गः । | १७ | १.१७ | ३ |
| कस्तरति कस्तरति मायाम् यः सङ्गं त्यजति यो महानुभावं सेवते निर्ममो भवति । | ४६ | ३.१३ | ८ |
| कामक्रोधमोहस्मृतिभ्रंशबुद्धिनाशकारणत्वात् । | ४४ | ३.११ | ८ |
| गुणमाहात्म्यासक्ति-रूपासक्ति-पूजासक्ति-स्मरणासक्ति-दास्यासक्ति-सख्यासक्ति-वात्सल्यसक्ति-कान्तासक्ति-आत्मनिवेदनासक्ति-तन्मयतासक्ति-परमविरहासक्ति-रूपा एकधा अपि एकादशधा भवति । | ८२ | ५.१६ | १५ |

| | | | |
|---|---|---|---|
| गुणरहितं कामनारहितं प्रतिक्षणवर्धमानं अविच्छिन्नं सूक्ष्मतरं अनुभवरूपम् । | ५४ | ४.०४ | १० |
| गौणी त्रिधा गुणभेदाद् आर्तादिभेदाद् वा । | ५६ | ४.०६ | १० |
| तत्तु विषयत्यागात् सङ्गत्यागात् च । | ३५ | ३.०२ | ७ |
| तत्प्राप्य तदेवावलोकति तदेव शृणोति तदेव भाषयति तदेव चिन्तयति । | ५५ | ४.०५ | १० |
| तत्रापि न माहात्म्यज्ञानविस्मृत्यपवादः । | २२ | १.२२ | ३ |
| तदर्पिताखिलाचारः सन् कामक्रोधाभिमानादिकं तस्मिन्नेव करणीयम् । | ६५ | ४.१५ | १२ |
| तदेव साध्यतां तदेव साध्यताम् । | ४२ | ३.०९ | ८ |
| तद्विहीनं जाराणामिव । | २३ | १.२३ | ४ |
| तन्मयाः । | ७० | ५.०४ | १३ |
| तरङ्गायिता अपीमे सङ्गात् समुद्रायन्ते । | ४५ | ३.१२ | ८ |
| तल्लक्षणानि वाच्यन्ते नानामतभेदात् । | १५ | १.१५ | ३ |
| तस्मात् सैव ग्राह्या मुमुक्षुभिः । | ३३ | २.०९ | ६ |
| तस्मिन्ननन्यता तद्विरोधिषूदासीनता च । | ९ | १.०९ | २ |
| तस्मिंस्तज्जने भेदाभावात् । | ४१ | ३.०८ | ७ |
| तस्याः ज्ञानमेव साधनमित्येके । | २८ | २.०४ | ५ |
| तस्याः साधनानि गायन्त्याचार्याः । | ३४ | ३.०१ | ७ |
| तीर्थीकुर्वन्ति तीर्थानि सुकर्मी कुर्वन्ति कर्माणि सच्छास्त्रीकुर्वन्ति शास्त्राणि । | ६९ | ५.०३ | १३ |
| त्रिरूपभङ्गपूर्वकम् नित्यदास्यनित्यकान्ताभजनात्मकं प्रेम कार्यं प्रेमैव कार्यम् । | ६६ | ४.१६ | १२ |
| त्रिसत्यस्य भक्तिरेव गरीयसी भक्तिरेव गरीयसी । | ८१ | ५.१५ | १५ |
| दुस्सङ्गः सर्वथैव त्याज्यः । | ४३ | ३.१० | ८ |
| न तत्सिद्धौ लोकव्यवहारो हेयः किन्तु फलत्यागः तत्साधनं च । | ६२ | ४.१२ | ११ |
| न तेन राजा परितोषः क्षुच्छान्तिर्वा । | ३२ | २.०८ | ६ |
| नारदस्तु तदर्पिताखिलाचारता तद्विस्मरणे परमव्याकुलतेति । | १९ | १.१९ | ३ |
| नास्ति तेषु जातिविद्यारूपकुलधनक्रियादि भेदः । | ७२ | ५.०६ | १३ |
| नास्त्येव तस्मिन् तत्सुखसुखित्वम् । | २४ | १.२४ | ४ |
| निरोधस्तु लोकवेदव्यापारन्यासः । | ८ | १.०८ | २ |

| | | | |
|---|---|---|---|
| पूजादिष्वनुराग इति पाराशर्यः । | १६ | १.१६ | ३ |
| प्रकाशते क्वापि पात्रे । | ५३ | ४.०३ | १० |
| प्रमाणान्तरस्यानपेक्षत्वात् स्वयं प्रमाणत्वात् । | ५९ | ४.०९ | ११ |
| फलरूपत्त्वात् । | २६ | २.०२ | ५ |
| बाहुल्यावकाशत्वाद् अनियतत्त्वाच्च । | ७५ | ५.०९ | १४ |
| भक्ता एकान्तिनो मुख्याः । | ६७ | ५.०१ | १३ |
| भक्तिशास्त्राणि मननीयानि तदुद्बोधकर्माणि करणीयानि । | ७६ | ५.१९ | १४ |
| भवतु निश्चयदार्ढ्यादूर्ध्वं शास्त्ररक्षणम् । | १२ | १.१२ | २ |
| महत्सङ्गस्तु दुर्लभोऽगम्योऽमोघश्च । | ३९ | ३.०६ | ७ |
| मुख्यतस्तु महत्कृपयैव भगवत्कृपालेशाद् वा । | ३८ | ३.०५ | ७ |
| मूकास्वादनवत् । | ५२ | ४.०२ | १० |
| मोदन्ते पितरो नृत्यन्ति देवताः सनाथा चेयं भूर्भवति । | ७१ | ५.०५ | १३ |
| य इदं नारदप्रोक्तं शिवानुशासनं विश्वसिति श्रद्धते स भक्तिमान् भवति सः प्रेष्टं लभते सः प्रेष्टं लभते । | ८४ | ५.१८ | १६ |
| यः कर्मफलं त्यजति कर्माणि संन्यस्स्यति ततो निर्द्वन्द्वो भवति । | ४८ | ३.१५ | ८ |
| यज्ज्ञात्वा मत्तो भवति स्तब्धो भवति आत्मारामो भवति । | ६ | १.०६ | १ |
| यतस्तदीयाः । | ७३ | ५.०७ | १४ |
| यत्प्राप्य न किञ्चिद् वाञ्छति न शोचति न द्वेष्टि न रमते नोत्साही भवति । | ५ | १.०५ | १ |
| यथा व्रजगोपिकानाम् । | २१ | १.२१ | ३ |
| यल्लब्ध्वा पुमान् सिद्धो भवति अमृतो भवति तृप्तो भवति । | ४ | १.०४ | १ |
| यो विविक्तस्थानं सेवते यो लोकबन्धमुन्मूलयति निस्त्रैगुण्यो भवति योगक्षेमं त्यजति । | ४७ | ३.१४ | ८ |
| यो वेदानपि संन्यस्यति केवलमविच्छिन्नानुरागं लभते । | ४९ | ३.१६ | ९ |
| राजगृहभोजनादिषु तथैव दृष्टत्वात् । | ३१ | २.०७ | ५ |
| लभ्यतेऽपि तत्कृपयैव । | ४० | ३.०७ | ७ |
| लोकवेदेषु तदनुकूलाचरणं तद्विरोधिषूदासीनता । | ११ | १.११ | २ |
| लोकहानौ चिन्ता न कार्या निवेदितात्मलोकवेदत्वात् । | ६१ | ४.११ | ११ |
| लोकेऽपि भगवद्गुणश्रवणकीर्तनात् । | ३७ | ३.०४ | ७ |

| | | | |
|---|---|---|---|
| लोकोऽपि तावदेव भोजनादि व्यापारस्त्वाशरीरधारणावधि। | १४ | १.१४ | २ |
| वादो नावलम्ब्यः। | ७४ | ५.०८ | १४ |
| शान्तिरूपात् परमानन्दरूपाच्च। | ६० | ४.१० | ११ |
| स तरति स तरति स लोकांस्तारयति। | ५० | ३.१७ | ९ |
| सङ्कीर्त्यमानः शीघ्रमेवाविर्भवत्यनुभावयति भक्तान्। | ८० | ५.१४ | १५ |
| सर्वदा सर्वभावेन निश्चिन्तैर्भगवानेव भजनीयः। | ७९ | ५.१३ | १४ |
| सा तु कर्मज्ञानयोगेभ्योऽप्यधिकतरा। | २५ | २.०१ | ५ |
| सा त्वस्मिन् परप्रेमरूपा। | २ | १.०२ | १ |
| सा न कामयमाना निरोधरूपत्वात्। | ७ | १.०७ | २ |
| सुखदुःखेच्छालाभादित्यक्ते काले प्रतीक्ष्यमाणे क्षणार्धमपि व्यर्थं न नेयम्। | ७७ | ५.११ | १४ |
| स्त्रीधननास्तिकचरित्रं न श्रवणीयम्। | ६३ | ४.१३ | ११ |
| स्वयं फलरूपतेति ब्रह्मकुमारः। | ३० | २.०६ | ५ |

## 2. संदर्भग्रंथसूची


Prabhavananda, S. (एन. डी.). *Narada's Way of Divine Love (Narada Bhakti Sutras).* Madras: Sri Ramakrishna Math: Madras.

subramanyam, S. Y. (1938). *नारदभक्तिसूत्राणि Narad's Aphorisms on Bhakti.* Holensripur, Mysore: The Adhyatma Prakash karyala.

गीताप्रेस. (1992). *नारद भक्ति सूत्र तथा शांडिल्य भक्ति सूत्र ( सरल भाषानुवाद).* गोरखपूर: गीताप्रेस गोरखपूर.

रा., प. ल. (एन. डी.). *नारद भक्ति सूत्र, मराठी भाषांतर.*

हनुमान, प. (1992). *प्रेमदर्शन (हिंदी), देवर्षी नारद रचित भक्ति सूत्र.* गोरखपूर: गीताप्रेस गोरखपूर.

हनुमान, प. (एन. डी.). *प्रेमदर्शन (मराठी), देवर्षी नारद रचित भक्ति सूत्र.* गोरखपूर: गीताप्रेस गोरखपूर.